शासनाने दिनांक १ ऑगस्ट २०१५ पासून ५० कोटीपेक्षा कमी उलाढाल असलेल्या व्यापाऱ्यांना स्थानिक संस्था करामधून सुट दिल्याने महानगरपालिकांच्या स्थानिक संस्था करापासूनच्या उत्पन्नामध्ये येणारी घट भरून काढण्यासाठी शासनाकडून देण्यात येणारे सहाय्यक अनुदान.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१६/(प्र.क्र.३६/नवि-३२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०१७

वाचा :-

१. शासन अधिसुचना, स्थासंक२०१५//प्र.क्र.४७/२०१५ नवि-३२,दि.०१.०८.२०१५
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२०.०४.२०१६
३. शासन निर्णय, स्थासंक/२०१५-प्र.क्र १३५/२०१५ /नवि-३२, दिनांक ३०.०४.२०१६.
४. शासन निर्णय, स्थासंक/२०१५-प्र.क्र १३५/२०१५ /नवि-३२, दिनांक १६.०५.२०१६.
५. शासन निर्णय, स्थासंक/२०१५-प्र.क्र १३५/२०१५ /नवि-३२, दिनांक ०४.०६.२०१६.
६. शासन निर्णय, स्थासंक/२०१५-प्र.क्र १३५/२०१५ /नवि-३२, दिनांक ०८.०७.२०१६.
७. शासन निर्णय, स्थासंक/२०१५-प्र.क्र १३५/२०१५ /नवि-३२, दिनांक १२.०८.२०१६.
८. शासन निर्णय, स्थासंक/२०१५-प्र.क्र १३५/२०१५ /नवि-३२, दिनांक ०२.०९.२०१६.
९. शासन निर्णय, स्थासंक-२०१६/प्र.क्र ३६/ नवि-३२, दिनांक २९.०९.२०१६.
१०. शासन निर्णय, स्थासंक-२०१६/प्र.क्र ३६/ नवि-३२, दिनांक २२.११.२०१६.
११. शासन निर्णय, स्थासंक-२०१६/प्र.क्र ३६/ नवि-३२, दिनांक १९.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

शासनाने दिनांक ०१ ऑगस्ट २०१५ पासून ५० कोटी पेक्षा कमी आर्थिक उलाढाल असलेल्या सर्व व्यापा-यांना स्थानिक संस्था कर भरण्यापासून सूट देण्याचा निर्णय घेतला आहे. यामुळे महानगरपालिकांच्या उत्पन्नामध्ये येणारी तुट भरून काढण्यासाठी महानगरपालिकांना यापुढे १% मुद्रांक शुल्क अधिभारापासून प्राप्त होणारे उत्पन्न, त्याचबरोबर ५० कोटीपेक्षा जास्त उलाढाल असलेल्या व्यापा-यांकडून महानगरपालिकांना प्राप्त होणारे स्थानिक संस्था करापासूनचे उत्पन्न हा पर्यायी स्त्रोत उपलब्ध असणार आहे. तसेच या पर्यायी स्त्रोतापासून प्राप्त होणारे उत्पन्न व सन २०१६-१७ मध्ये महानगरपालिकांना प्राप्त होणारे स्थानिक संस्था करा पासूनचे संभाव्य उत्पन्न यामध्ये येणारी तूट भरुन काढण्यासाठी शासनाकडून अनुदानाच्या स्वरूपात महानगरपालिकांना देण्यात येणार आहे.

या प्रयोजनासाठी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात करण्यातआलेल्या तरतूदीमधून माहे जानेवारी २०१७ या महिन्याकरीता संबंधित महानगरपालिकांना अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. तथापि, शासनाने माहे ऑगस्ट २०१५ ते मार्च २०१६ या ८ महिन्यामध्ये रु.१२१.२७ कोटी जादा वितरीत केले आहेत. सदरहू रक्कम माहे जानेवारी २०१७ च्या देय अनुदानातून वजा करुन शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

२५ महानगरपालिकांना माहे- जानेवारी २०१७ या महिन्यातील स्थानिक संस्था कराची तूट भरून काढण्यासाठी रूपये ३२३.८६ कोटी (रू. तिनशे तेवीस कोटी शहाऐंशी लाख फक्त.) एवढे अनुदान पुढील प्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

## सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील जानेवारी २०१७ महिन्याकरीता वाटप करावयाच्या महानगरपालिका निहाय्य अनुदानाचे विवरण पत्र

| अ.क्र. | महापालिकेचे नाव | माहे जानेवारी २०१७ करीता देय अनुदान रु. कोटीमध्ये |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | मिरा-भाईंदर | ८.७९ |
| २ | वसई-विरार | १०.०३ |
| ३ | सोलापुर | १२.७० |
| ४ | कोल्हापुर | ६.२३ |
| ५ | जळगांव | ६.०१ |
| ६ | औरंगाबाद | ११.०१ |
| ७ | नांदेड-वाघाळा | ३.१६ |
| ८ | परभणी | ०.०० |
| ९ | लातुर | ०.५४ |
| १० | कल्याण डोंबवली | ०.०० |
| ११ | उल्हासनगर | ११.०० |
| १२ | अहमदनगर | ५.१८ |
| १३ | चंद्रपुर | ३.६० |
| १४ | अमरावती | ५.९७ |
| १५ | अकोला | ३.९६ |
| १६ | सांगली-मिरज-कुपवाड | ८.५४ |
| १७ | पुणे | ६३.१४ |
| १८ | पिंपरी-चिंचवड | २८.८६ |
| १९ | ठाणे | ४१.४८ |
| २० | नाशिक | १०.९० |
| २१ | मालेगांव | ९.९५ |
| २२ | धुळे | ५.५४ |
| २३ | नवी-मुंबई | ११.१६ |
| २४ | भिवंडी- निजामपुर | १५.५७ |
| २५ | नागपूर | ४०.५४ |
| **एकुण** | | **३२३.८६** |

२. याकरीता श्री. सुधाकर ज्ञा. बोबडे उप सचिव, (नवि-५) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री. ए. कि. सहाणे कक्ष अधिकारी, (नवि-५) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम परिच्छेद १ मध्ये नमूद केलेल्या विवरण पत्रातील संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिका-यांनी करावयाची आहे.

३. याकरीता होणारा खर्च "मागणी क्र.एफ -४ ३६०४ स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहंस्तांकित रकमा देणे. १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (०१) स्थानिक संस्था कराच्या (एलबीटी) बदल्यात महानगरपालिकांना राज्याचे अर्थसहाय्य (३६०४०९४२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा

४. प्रमाणित करण्यात येते की, शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. २०. ०४. २०१६ मधील सर्व अटी व शर्तीची या संदर्भात पूर्तता होत असून, सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २०.०४.२०१६ च्या शासन निर्णय क्रमांक अन्वये अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णयानुसार वितरीत करावयाच्या निधीची रक्कम ही ८०% च्या मर्यादेत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्तळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक. २०१७०२२८१८०३२७१२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashikant Kashinath Sanap

Digitally signed by Shashikant Kashinath Sanap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15a77c0947426b11b7c7f646f29f3b1a483717eec6d16a0ebd196cbc7f25d62f, cn=Shashikant Kashinath Sanap
Date: 2017.02.28 18:14:45 +05'30'

(शशिकांत का. सानप)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा..मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद संचालनालय ,वरळी ,मुंबई.
३. संबंधित जिल्हाधिकारी.
४. आयुक्त संबंधित महानगरपालिका.
५. महालेखापाल ,महाराष्ट्र) २/१-लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर)
६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.
९. वित्त विभाग/व्यय-३ /अर्थ-१६/आर्थोपाय, मंत्रालय, मुंबई ,
१०. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
११. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव,
१२. नगर विकास विभाग/कार्यासन-नवि-४, मंत्रालय, मुंबई-३२,
१३. कार्यासन नवि-३२ निवड नस्ती.